**लपात, पिंपरी-घुमरी ता. आष्टी, जि. बीड योजनेस, सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा १०११/(४६३/२०११)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रुवारी , २०१५

वाचा
1. **कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखेविम/२०९/(७२९/२००९)/लपा३, दि.१९/१०/२०११ चे पत्र.**
2. **वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्रं. व्ययस- २०१४/प्रक्रं१९९/अर्थ-२, दि.१ जानेवारी, २०१५**

प्रस्तावना

बीड जिल्ह्यातील लपात,पिंपरी घुमरी या योजनेस दिनांक १२/१२/२००७ अन्वये रु.३०३.३४ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. सदर अंदाजपत्रक २००५-०६ च्या दरसुची नुसार तयार करण्यात आलेले होते.प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदलांमुळे व इतर कारणांमुळे (निविदा अधिक्य इ.) किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन २००९-१० ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु.५०२.६८ लक्ष रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) बीड जिल्ह्यातील लपात,पिंपरी घुमरी या योजनेस या योजनेस सन २००५-०६ ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु . ५०२.६८ लक्ष (रुपये पाच कोटी दोन लाख अडुसष्ठ हजार फक्त )या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी कामासाठीची एकूण तरतूद रु.४७०.९४ लक्ष (रुपये चार कोटी सत्तर लाख चौ-याण्व हजार फक्त) व अनुषंगिक खर्चासाठीची एकूण तरतूद रु.३१.७४ लक्ष (एकतीस लाख अठठावीस चौ-याहत्तर हजार फक्त) आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२१ ऑगस्ट २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील " सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात यासाठी तरतूद उपलब्ध करुन दिली जाणार नाही, तत्पूर्वी काम पूर्ण करावे या अटीवर प्रस्ताव मान्य." या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा हा निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (१२)(०१) मराठवाडा विभागासाठीचा भाग भांडवली अंशदान (४७०२ ७६२१) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

४) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२००/का.१४३४ दि. १८/०७/२०१३ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १७१/व्यय १२ दि.२१/०३/२०१४ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. २१ ऑगस्ट २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या

मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५) या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र./२०१५ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७११४२१२४६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.07 11:56:41 +05'30'

**( रा. बा. क्षीरसागर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
५) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) जिल्हाधिकारी बीड, बीड.
७) अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे मंडळ, उस्मानाबाद.
८) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
९) उपसचिव (लपा)/ अवरसचिव(लपा) /उपअभियंता(लपा-१),जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.

**(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. सुप्रमा १०११/(४६३/२०११) ल.पा.१, दि.५ फेब्रुवारी, २०१५ चे सहपत्र)**

**विवरण पत्र**

लपात, पिंपरी-घुमरी, ता. आष्टी, जि. बीड अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १ | अ - प्राथमिक कामे | ३.२२ |
| २ | ब - भू संपादन | १५३.६० |
| ३ | सी - कामे | ३१२.६० |
| ४ | के- इमारत | ०.२० |
| ५ | ओ संकीर्ण | ०.२० |
| ६ | पी देखभाल | ०.२२ |
| ७ | आर दळणवळण | ०.९० |
| ८ | अनुषंगिक खर्च | ३१.७४ |
| | **एकूण** | **५०२.६८** |

**ठळक वैशिष्टे**

१. योजनेची सिंचन क्षमता - २६९ हेक्टर
२. नियोजित पाणी साठा - १२३६ स.घ.मी.
३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ४०६५०/-स.घ.मी.
४. लाभव्यय गुणोत्तर - १.०४